आकस्मिक वैद्यकीय सेवा MEMS) बाबत
प्रसिध्दी व जनजागृती उपक्रम नियोजन सन
२०१७-१८ साठी प्रशासकीय मान्यता
देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः आयईसी २०१७/प्र.क्र.३२ /आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१७.

वाचा :

१) आयुक्त,आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/ कुक.क-१५/टे-३/MEMS प्रसिध्दी/न.क्र.आयईसी-३/४५/२०१७, दिनांक २७.०७.२०१७.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा प्रकल्प या योजनेसंबंधी राज्यात व्यापक प्रसिध्दी आणि जनजागृती करण्यासाठी सन २०१७-१८ या वर्षात राबविण्यात येणा-या खाली नमूद जनजागृतीविषयक उपक्रमास आणि त्यासाठी आवश्यक अनुदान खर्च करण्यास त्याखाली नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून याव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | अपेक्षित खर्च (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | आकाशवाणीवरुन आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) बाबत संदेशाची रेडीओ जिंगल्स जन जागृतीसाठीप्रसारीत करणे | दररोज सकाळी व सायंकाळी बातम्यापुर्वी मंजूर निधीमध्ये बसतील तेवढी प्रसारण करणे. | २०,००,००० |
| २ | राज्यातील सर्व जिल्हयातील परिवहन मंडळाच्या आगारामधील | राज्यातील सर्व जिल्हयातील परिवहन मंडळाच्या आगारामधील निवडक १२७५ एसब.टी.सेसवर दरवाज्याच्या बाजूचे साईड पॅनेलवर२२ फूट x २ फूट | ९८,९२,०८८/- |

| | | | |
|---|---|---|---|
| | निवडक एस.टी.बसेसवर आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ याबाबत संदेश प्रदर्शित करणे. | आकाराचा संदेश प्रदर्शित करणे.<br>(एका एस.टी.बस वर एक महिण्यासाठी संदेश प्रदर्शित करावयाचा खर्च :-<br>१) एका साईड पॅनलवर संदेश प्रदर्शित करण्याचे भाडे<br>+ रु.५५२५/-<br>२) संदेश छपाई व लावणे खर्च रु.१०५०/-<br>------------------------------------------<br>एकूण रु.६५७५/-<br>+ १८% जीएसटी रु. ११८३.५०/-<br>एकूण रु.७७५८.५०/-(प्रति बस प्रति माह खर्च) याप्रमाणे १२७५ एस.टी.बसेसवर संदेश प्रदर्शित करण्यात येईल. महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाने राज्यातील एस.टी.बसेसवर संदेश प्रदर्शित करण्यासाठी एकाधिकृत केलेल्या मे.राकेश ॲडर्व्हटायझिंग प्रा.लि.मुंबई या संस्थेकडून सदर काम करुन घ्यावे. | |
| ३ | राज्यातील सर्व प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र, ग्रामिण रुग्णालय, उपजिल्हा रुग्णालय, नगरपालिका रुग्णालय, महानगरपालिका, ग्रामपंचायत कार्यालय इ. व इतर संस्थांच्या महत्वाच्या ठिकाणी पीव्हीसी बॅनर्स तयार करुन आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ याबाबत संदेश प्रदर्शित करणे | राज्यातील आरोग्यसंस्थांना खालीलप्रमाणे पीव्हीसी बॅनर्सचा पुरवठा करणे<br>प्रा.आ. केंद्र १८११ X २= ३६२२,<br>उपकेंद्र १०५८० X २ = २११६०,<br>ग्रामिण रुग्णालय ३६०x २= ७२०,<br>उपजिरु ८६X ३= २५८,<br>जिल्हा रुग्णालय ३४ X ५ = १७०,<br>ग्रामपंचायत कार्यालये २७८७३ X २= ५५७४६,<br>पंचायत समिती ३५३ x ५= १७६५,<br>नगरपरलिका २५० x ३= ७५०,<br>नगरपंचायत १३ x ५= ६५,<br>सर्व महानगरपालिका = (२०० x २७) ५४००<br>आयईसी ब्युरो व एनआरएचएम कार्यालय = ६६२<br>असे एकूण ९०३१८ बॅनर्स तयार करणे.<br>**एका पीव्हीसी बॅनर्सचा तपशील-**<br>**आकार** - ५ फूट x ३ फूट= १५ स्क्वे.फुट<br>**छपाई-** चार रंगात सचित्र डिजीटल पीव्हीसी बॅनर्स, अडकवण्यासाठी आयलेटची सुविधा<br>**खर्च प्रति बॅनर**- रु.७.१० प्रति स्क्वे.फुट x १५ स्क्वे.फुट | ९६,१८,७५० |

| | | | |
|---|---|---|---|
| | | = रु. १०६.५०/-<br>सदर काम शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.१४ जुलै, २०१६ अन्वये बॅनर्स छपाई करुन पुरवठा (लावणे व काढणे वगळून) करण्यासाठी एकाधिकृत केलेल्या मे.कल्याणी कार्पोरेशन,पुणे या संस्थेकडून करून घ्यावे. | |
| ४ | राज्यातील प्रवासी रिक्षांच्या पाठीमागील बाजूवर आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ याबाबत संदेश प्रदर्शित करणे | प्रवासी रिक्षाच्या पाठीमागील बाजूचे पॅनलवर ३ फूट x २ फूट आकाराचे सचित्र संदेश एक महिण्यासाठी प्रदर्शित करणेसाठी प्रतिरिक्षाचा खर्च : -<br>संदेश प्रदर्शित भाडे - रु.५००/-<br>संदेश प्रिंटींग करणे - रु.१००/-<br>संदेश लावणे/चिटकवणे - रु.१००/-<br>आरटीओ जाहिरात - रु.५००/-<br>१८ टक्के जीएसटी - रु.२१६/-<br>एकूण रु. १४१६/-<br>याप्रमाणे राज्यातील एकूण ४८७० प्रवासी रिक्षांवर एक महिण्यासाठी डी.ए.व्ही.पी. नवी दिल्ली यांचे मान्य दरानुसार sole rights असलेल्या मे.हितेंद्र ॲडर्व्हटाईझींग ॲण्ड मार्केटींग प्रा.लि.या संस्थेकडून करून घ्यावे. | ६८,९५,९२० |
| ५ | राज्यातील सर्व जिल्हे व निवडक तालुक्यांच्या मुख्यालयाच्या एस.टी.स्टँड वरील होर्डीगवर संदेश प्रदर्शित करुन जनजागृती करणे | आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ याबाबत संदेश राज्यातील सर्व जिल्हे व निवडक तालुक्यातील एस.टी.स्टँड वरील अभारण्यात आलेल्या २२ x १० आकाराच्या होर्डीगवर संदेश प्रदर्शित करणे.<br>**१)जिल्हा मुख्यालयाच्या एस.टी.स्टँड वरील होर्डीगवर संदेश प्रदर्शित करणेचा खर्च:**<br>एका होर्डीगचे १ महिण्याचे भाडे रु.३६,०००/- + प्रिंटींग चार्जेस रु.४०००/- + मॉटींग चार्जेस रु.१५००/- असे एकूण रु.४१,५०० + १८ टक्के जीएसटी (रु.७४७०/-) असे १ महिण्यासाठी एक होर्डीगसाठी एकूण रु.४८९७०/- इतका खर्च उपेक्षित आहे. याप्रमाणे ४४ होर्डीगसाठी एका महिण्याला रु.२१,५४,६८०/- इतका खर्च उपेक्षित.<br>**२) निवडक तालुक्याच्या ठिकाणी होर्डीग्जचा खर्च:**<br>एका होर्डीगचे १ महिण्याचे भाडे रु.३०,०००/- + प्रिंटींग | ४५,००,५२० |

| | | | |
|---|---|---|---|
| | | चार्जेस रु.४०००/- + मॉटींग चार्जेस रु.१५००/- असे एकूण रु.३५,५०० + १८ टक्के जीएसटी (रु.६३९०/-) असे १ महिण्यासाठी एक होर्डीगसाठी एकूण रु.४१८९०/- इतका खर्च उपेक्षित आहे. असा ५६ तालुक्यांच्या होर्डीग्जसाठी १ महिण्याला रु.२३,४५,८४०/- इतका खर्च उपेक्षित.<br>जिल्हा व तालुक्यांच्या होर्डीग्जसाठी एकूण रु.४५,००,५२०/- इतका एका महिण्यासाठी खर्च अपेक्षित आहे.<br>सदर काम MSRTC ने नियुक्त केलेल्या मे.श्री.ओम ॲडव्हर्टाझिंग एजन्सी प्रा.लि.मुंबई या अधिकृत केलेल्या संस्थेकडून करून घ्यावे. | |
| ६ | पोस्टर छपाई करणे | आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ याबाबतचे संदेश सचित्रासह पोस्टर्स छपाई करुन राज्यातील सर्व आरोग्य संस्थांमध्ये वाटप करण्यात येऊन महत्वाच्या ठिकाणी प्रदर्शित करणे<br>**आकार** - १७ इंच x २२ इंच या आकाराचे १५० जी.एस.एम. आर्ट पेपरवर ४ रंगात एका बाजूने १५ मायक्रॉन बी.ओ.पी.पी. लॅमिनेशन व मागील बाजूस ४ नग १७ इंच x ½ इंच गमिंग स्क्रीप्स.<br>**खर्च** -प्रति पोस्टर्स रु.६/-<br>**पोस्टर्सची संख्या** २.५ लाख<br>सदर खरेदी ई-निविदा प्रक्रियेव्दारे करण्यात येतील. | १५,००,००० |
| ७ | मुबई व उपनगर शहरातील रेल्वेच्या बाहेरील बाजूस संदेश प्रसिध्द करणे | आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ याबाबतचे संदेश मुबई व उपनगर शहरातील रेल्वेच्या बाहेरील बाजूस प्रदर्शित करणे. डिस्पले कॉस्ट रु.६,००,०००/- + प्रिटींग कॉस्ट रु.९०,०००/- + पेस्टींग ॲण्ड रिपेरिंग कॉस्ट रु.७६२१०/- + जीएसटी (१८ टक्के) रु.१,३७,९१८/- असा एक रेल्वेसाठी रु.९०४१२८/- याप्रमाणे ३ रेल्वेसाठी संदेश प्रदर्शित करणे.<br>सदर काम रेल्वे प्रशासनाने अधिकृत संस्था म्हणून निवड केलेल्या संस्थेकडून DAVP दराने यासाठी शासनाच्या पॅनलवर असणा-या संस्थेकडून मान्य | २७,१२,३८४ |

| | | | |
|---|---|---|---|
| | | केलेल्या दरानुसार करून घेण्यात यावे. | |
| ८ | **राज्यातील सर्व मोबाईल धारकांना एस.एम.एस. व्दारे संदेश पाठविणे** | आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) या विषयाबाबत राज्यातील २ कोटी मोबाईल धारकांना एकावेळी संदेश देणे (एका संदेशाची डि.ए.व्ही.पी. दर ०.०६३ पैसे x २ कोटी= १२,६०,०००/- + १५ टक्के एजन्सी कमिशन १,८९,०००/- = १४,४९,०००/- + १८ टक्के सर्व्हिस टॅक्स रु.२,६०,८२०/- = १७,०९,८२०/-)<br>सदरचे काम केद्र शासनाच्या माहिती व प्रसारण मंत्रालयाचे D.A.V.P. दराने यासाठी शासनाच्या पॅनलवर असणा-या संस्थेकडून मान्य केलेल्या दरानुसार करून घेण्यात येईल. | १७,०९,८२०/- |
| ९ | सिनेमागृहात चित्रपटादरम्यान डॉक्युमेंटरी प्रसारीत करणे | आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) टोल फ्री क्रमांक १०८ बाबत माहितीची तयार करण्यात आलेली डॉक्युमेंटरी फिल्म राज्यातील शहरी व ग्रामिण भागातील सिनेमागृहात ३० दिवस मंजूर अनुदानातून बसतील तेवढया स्पॉटस् दाखविण्यात येतील.<br>५०० पेक्षा जास्त शीटस् असलेल्या सिनेमागृहात एक स्पॉट (६० सेकंद) खर्च रु. ९०/- खर्च येईल.<br>५०० पेक्षा कमी शीटस् असलेल्या सिनेमागृहात ६० सेकंदासाठी रु.७८/- इतका खर्च येईल.सिनेमागृहात चित्रफित प्रसारीत करण्यासाठी केंद्रशासनाच्या माहिती व प्रसारण मंत्रालयाचे D.A.V.P. दराने यासाठी शासनाच्या पॅनलवर असणा-या संस्थेकडून मान्य केलेल्या दरानुसार करून घेण्यात यावे. | २२,७०,५१८/- |
| | | **एकूण** | **४,११,००,०००** |

२. याबाबतचा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियान (एन.एच.एम.) अंतर्गत आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) या योजनेअंतर्गत पीआयपी सन २०१६-१७ या वर्षात आयईसी उपक्रमासाठी मंजूर असलेल्या रु.४.११ कोटी या Committed Expenditure म्हणून सन २०१७-१८ या वर्षात ठेवण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात येईल.

**<u>३.अटी व शर्ती</u>-:**

१) सदर खरेदीसाठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग III/उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. एकलस्त्रोत खरेदीबाबत सदर शासन निर्णयामधील "शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" यात नमूद परिच्छेद क्रमांक ३.२.३ येथील तरतुदीनुसार तसेच विहित कार्यपध्दतीस अनुसरुन करण्यात यावी.

२) खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधीत तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश के कोणत्याही कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच त्याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत.त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

४) खरेदी करण्यात येणा-या बाबींची पुरवठापुर्व /पुरवठयानंतर नमुना तपासणी (Pre/post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विर्निदेश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (Storage and Distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply Chain management) व वस्तुसुची व्यवस्थापन (inventary Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६) सदर खरेदीची व्दिरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८) शासननिर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र. ६ मधील अटींची पूर्तता करण्यात यावी.

९) खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमीत करण्यात यावेत.

४. सदर उपक्रमावरील खर्च **राष्ट्रीय आरोग्य अभियान (एन.एच.एम.) अंतर्गत** आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) या योजनेअंतर्गत पीआयपी सन २०१६-१७ या वर्षात आयईसी उपक्रमासाठी मंजूर रु.४.११ या Committed Expenditure म्हणून सन २०१७-१८ या वर्षात ठेवण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, शासननिर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२८१२१५५३५११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.08.28 15:53:52 +05'30'

**( रो.दि.कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन)आरोग्य सेवा, मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).